राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम
केंद्र हिश्श्यांतर्गत अनुसुचित जनजाती क्षेत्र
उपयोजना (आदिवासी) या घटकासाठी
ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी अनुदाने
(लेखाशिर्ष २२१५ ९८५३)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१७/ प्र.क्र.११९/पापु-१०**
७ वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ३० जानेवारी,२०१९

<u>वाचा -</u>

१) आदिवासी विभाग, शा. नि. क्र. बीयुडी - २०१८/ प्र.क्र.०६/ कार्यासन-६, दि.२०.११.२०१८
२) केंद्रशासनाचे पत्र क्र W-११०२०/१९७/२०१५-water-I/१५०, दि.१५.०३.२०१८
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

<u>प्रस्तावना -</u>

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरुस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून जनजाती क्षेत्र उपयोजना या अंतर्गत प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदाना संदर्भात आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये मागणी क्र. टी-५, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता,०१ पाणी पुरवठा, ७९६, जनजाती क्षेत्रउपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०१)(०९), राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम केंद्र हिस्सा, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)(२२१५ ९८५३) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी रु. ४०.५८०५ कोटी एवढा निधी आदिवासी विभागाने, दि.२०.११.२०१८ च्या शासन निर्णयान्वये या विभागास अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीव्दारे सुपुर्द केला आहे. सदर निधी अंमलबजावणी यंत्रणांना ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता लेखाशिर्ष २२१५ ९८५३ या खाली रु.५.०० कोटी (रुपये पाच कोटी मात्र) एवढा निधी जिल्हा परिषद, पालघर यांना कव्हरेज व गुणवत्ताबाधीत या घटकांसाठी अर्थसंकल्प प्रणालीव्दारे पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी सदर निधी आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधिन शासन निर्णयानुसार जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत गांवाच्या पाणी पुरवठा

योजनांसाठी कव्हरेज व गुणवत्ताबाधीत या घटकांसाठी खर्च करावा. सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केवळ जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत केंद्र शासनाने दिलेल्या सूचनेनुसार ग्रामीण भागातील अनुसुचित जमातींचे प्राबल्य असलेल्या (Rural Habitations having Majority of/ Dominated by ST Population) भागांमधील नळ पाणी पुरवठा योजनांसंदर्भात केंद्र शासनाने व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावायाचा आहे..

२) संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने (जिल्हा परिषद, पालघर) या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३) वरील अटी/ शर्तीची जिल्हा परिषद, पालघर यांच्याकडून पुर्तता होत आहे ह्याची शासनाला खात्री करून घेता यावी म्हणून महालेखपाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास लेखा परिक्षणाकरिता जिल्हा परिषद, पालघर यांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषद, पालघर संपुर्ण मदत व सुविधा पुरवतील.

४) ग्राम विकास विभागाच्या शासन परिपत्रक क्र. आरसीएन-१०८९/ सीआर-३०२७/२८, दि.०५.०९.१९९० मधील सुचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना जिल्हा परिषद, पालघर यांनी या विभागातील कार्यासन पापु-०५ व पापु-२० ला सादर करावे.

५) या मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत

६) सदर निधी खर्च शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र. टिएसपी-१०८०/८७१०/ प्र.क्र. ३१/ कार्यासन-०५, दि.०९.०३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण खर्च होईल, याची दक्षता घ्यावी तसेच हा खर्च करताना आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय क्र. टिएसपी-२००३/ प्र.क्र. १०१/ कार्यासन-६, दि.२६.०७.२००४ व टिएसपी-२००५/ प्र.क्र. ५९/ कार्यासन-६, दि.१०.११.२००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घ्यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करून दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्राकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनांतर्गत केलेली तरतुद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करू नये. तसे केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी जिल्हा परिषद, पालघर यांची राहील.

ह) या संदर्भात आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०१८/ प्र.क्र.०६/ कार्यासन-६, दि.२०.११.२०१८ च्या शासना निर्णयातील तरतुदींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

२. सदर निधीतून करण्यात आलेल्या खर्चाची नोंद केंद्र शासनाच्या IMIS प्रणालीवर घेऊन ती वेळोवेळी अद्यावत करण्यात यावी. तसेच BDS प्रणालीवर मुक्त केलेली रक्कम जिल्हा परिषद, पालघर यांनी त्वरीत संबंधित कोषागारातून काढण्याची कार्यवाही करावी. कोषागारातून रक्कम वेळीच न काढली गेल्यास तसेच सदर रक्कम या शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनांसाठी न वापरण्यात आल्यास त्याबाबतची संपुर्ण जबाबदारी संबंधितांची राहील.

३. यावर होणारा खर्च क्र. टी-५, लेखाशिर्ष२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता,०१ पाणी पुरवठा, ७९६, जनजाती क्षेत्रउपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०१)(०९), राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम केंद्र हिस्सा, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)(२२१५ ९८५३) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र. बीयुडी-२०१८/ प्र.क्र.०६/ कार्यासन-६, दि.२०.११.२०१८ अन्वये निधी वितरणाबाबत विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ८ व क्र. ८ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच या आदेशान्वये मंजूर व मुक्त केलेली रु. रु.४०.५८०५ कोटी एवढी केंद्र हिश्श्याची रक्कम महाराष्ट्र राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याची खात्री वित्त विभाग- अर्थोपाय शाखा यांच्याकडून करण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२२१११५०२७३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Gorakh Bharate

Digitally signed by Ravindra Gorakh Bharate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, serialNumber=fd232eb47eb633cb760c7bd2acf421b01b1da040dc965254760018b5f4e33be5, cn=Ravindra Gorakh Bharate
Date: 2019.01.31 11:06:43 +05'30'

**डॉ.रविंद्र भराटे**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महारष्ट्र-१-मुंबई/२- नागपुर,

२. आदिवासी विकास विभाग,कार्यासन-६/१४, मंत्रालय, मुंबई,

३. आयुक्त आदिवासी विकास, नाशिक,
४. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास , कोकण/ नाशिक/ नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, मुंबई,
८. संचालक (वित्त) ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
१०.पापु-०४/२०/२३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
१२.निवडनस्ती पापु-१०.